**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, मौजे साकूर, ता. संगमनेर, जि. अहमदनगर येथे मुलांचे व मुलींचे वसतीगृह बांधणे व आश्रमशाळेसाठी टाईप-१ निवासस्थानाचे बांधकाम करणेबाबतच्या अंदाजपत्रकांस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शाआबां-२०१३/प्र. क्र. ७२८ /का.१३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०५ ऑगस्ट, २०१४.

**वाचा:-**

आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्र. शाआशा-२०१०/प्र.क्र.३०/का.८(२), दि. १२.१२.२०१३.

**प्रस्तावना :-**

एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा साकूर, ता. संगमनेर, जि. अहमदनगर येथे मुलांचे व मुलींचे वसतीगृह बांधणे व आश्रमशाळेसाठी टाईप-१ निवासस्थानाचे बांधकाम करणेबाबतची प्रत्येकी अनुक्रमे रु. ५३४.४२ लक्ष व रु. ७३.८७ लक्ष इतक्या रकमेची अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास प्राप्त झालेली आहेत. सदर अंदाजपत्रके सन २०१२-१३ च्या दरसुचीवर आधारीत आहे.

२. उपरोक्त प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याच्या अनुषंगाने अंदाजपत्रक तांत्रिक मान्यतेसाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे पाठविण्यात आले होते. सदर अंदाजपत्रकात आवश्यक त्या सुधारणा/दुरुस्त्या केल्यानंतर सार्वजनिक बांधकाम विभागाने खर्चाच्या अंदाजास सहमती दिलेली आहे. त्यानुसार अंदाजपत्रकाला प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांचे अंतर्गत शासकीय आश्रमशाळा साकूर, ता. संगमनेर, जि. अहमदनगर येथे मुलांचे व मुलींचे वसतीगृह बांधणे व आश्रमशाळेसाठी टाईप-१ निवासस्थानाचे बांधकाम करणेबाबतच्या अंदाजपत्रकांस सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी दिलेल्या सहमतीस अनुसरुन मुलांचे व मुलींचे वसतीगृह बांधण्यासाठी रु.४,८५,८१,०७७ /- ( रुपये चार कोटी पंचाऐंशी लाख एक्यांऐंशी हजार सत्त्याहत्तर फक्त ) व टाईप-१

निवासस्थान बांधण्यासाठी रु.६७,०५,६२०/- (रुपये सदुसष्ट लाख पाच हजार सहाशे वीस फक्त) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु-मोटो रिट याचिका क्र. १४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार सदर काम सुरु होण्यापूर्वी व पूर्ण् झाल्यानंतर त्याचे व्हिडीओ शुटींग करुन त्याची सी.डी. शासनास सादर करावी. प्रस्तावित इमारतीचे बांधकाम किती मुदतीत पुर्ण करण्यात येणार आहे याबाबतचे लेखी पत्र संबंधित कंत्राटदार / ठेकेदार यांचेकडून प्राप्त करुन घेऊन ते शासनास तात्काळ सादर करावे, तसेच प्रत्यक्ष बांधकामाचे वेळी व बांधकाम पुर्ण झाल्यावर कामाची व मालाची गुणवत्ता तपासून संबंधितांचे प्रमाणपत्र घेऊन त्याची एक प्रत शासनास सादर करावी.

३. बांधकामाच्या कामाचा दर्जा तसेच बांधकामास होणारा विलंब यांवर देखरेख करण्याची जबाबदारी आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर यांची राहील.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१मधील सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २७०/ इ.मा.- २, अन्वये दि.३०/०६/२०१४ रोजी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०५११२९४८५२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2014.08.05 11:27:41 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
अवर सचिव, आदिवासी विकास विभाग.

**प्रत,**

१. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
२. उप सचिव (कार्यासन- ०६ / १३ ), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक.
५. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, संगमनेर.
६. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर, जि. अहमदनगर .
७. महालेखापाल (लेखा परिक्षा ), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मंबई .
८. महालेखापाल (लेखा परिक्षा ), / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- २, नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर.
१०.आदिवासी विकास निरिक्षक, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, राजूर, जि. अहमदनगर.
११.कक्ष अधिकारी (इमारती-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१२.कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३.निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

-----------------------